**सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, अपिल शाखा (रिट सेल), मुंबई या कार्यालयाकरिता एमटीएनएल, कुपरेज या इमारतीमधील ७ व्या मजल्यावरील जागा भाडे तत्वावर उपलब्ध करुन देण्यासाठी येणाऱ्या खर्चास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र.सवरी-१४१७/प्र.क्र.११७/१७/का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२,
दिनांक : ३१ ऑगस्ट, २०१७

<u>संदर्भ :</u>- १) सरकारी वकीलांचे कार्यालय, अपिल शाखा(रिट सेल), उच्च न्यायालय, मुंबई यांचे दि.१०.३.२०१७ चे पत्र.
२) सरकारी वकीलांचे कार्यालय, अपिल शाखा(रिट सेल), उच्च न्यायालय, मुंबई यांचे दि.१८.८.२०१७ चे पत्र व याचिका क्र.२१४१/१९९० मध्ये मा.उच्च न्यायालयाने दि.११.८.२०१७ रोजी दिलेले आदेश.
३) मुख्य सचिवांचे अर्ध शासकीय पत्र क्र.CSO-२०१७/e-२५२२४१६/D-१, दि.२२.८.२०१७

<u>प्रस्तावना :</u>-

विधि व न्याय विभागाच्या अखत्यारीतील सरकारी वकील, अपिल शाखा (रिट सेल), उच्च न्यायालय, मुंबई या कार्यालयाचे काम मा. उच्च न्यायालयाच्या कामकाजाशी निगडीत असून, मागील काही वर्षात न्यायालयीन प्रकरणांच्या संख्येत दिवसेंदिवस वाढ होत असल्यामुळे न्यायालयीन प्रकरणे ठेवण्यासाठी तसेच कर्मचारी व विधि अधिकारी यांना बसण्यासाठी सध्याची जागा अत्यंत अपुरी पडत आहे. त्यामुळे संदर्भ क्र.१ येथील दि.१०.३.२०१७ च्या पत्रान्वये उक्त कार्यालयाने एमटीएनएल, कुपरेज या इमारतीमधील ७ व्या मजल्यावरील अतिरिक्त ७००० चौ.फु. जागा भाडे तत्त्वावर उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला होता.

२. दरम्यानच्या कालावधीत मा.उच्च न्यायालयाने याचिका क्र.२१४१/१९९० च्या दि.११.८.२०१७ रोजीच्या सुनावणीच्यावेळी दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने मा. मुख्य सचिवांनी संदर्भ क्र.३ येथील अर्ध शासकीय पत्रान्वये नियुक्त केलेल्या अतिरिक्त मुख्य सचिव (व्यय)/वित्त विभाग, प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग व प्रधान सचिव व विधि परामर्शी यांनी दि.२८.८.२०१७ रोजी केलेल्या निरिक्षणानुसार सरकारी वकीलांचे कार्यालय, अपिल शाखा (रिट सेल), उच्च न्यायालय, मुंबई या कार्यालयास अतिरिक्त जागेची आवश्यकता असल्याचे दिसून आले आहे. त्याअनुषंगाने सरकारी वकील, अपिल शाखा (रिट सेल), उच्च न्यायालय, मुंबई या कार्यालयास एमटीएनएल, कुपरेज या इमारतीमधील ७ व्या मजल्यावरील अतिरिक्त ७००० चौ.फु. जागा भाडे तत्त्वावर देण्याचा व त्यासाठी येणाऱ्या खर्चास मंजूरी देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

सरकारी वकील, अपिल शाखा (रिट सेल), उच्च न्यायालय, मुंबई या कार्यालयास एमटीएनएल, कुपरेज या इमारतीमधील ७ व्या मजल्यावरील अतिरिक्त ७००० चौ.फु. इतकी जागा कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग (सार्वजनिक बांधकाम विभाग), मुंबई यांनी प्रमाणित केलेल्या रु.२८९.४० प्रति चौ. फु. या दराने भाडे तत्त्वावर उपलब्ध करुन देण्यासाठी आवश्यक असणाऱ्या प्रति महिना रु.२०,२५,८००/- (रुपये वीस लाख पंचवीस हजार आठशे फक्त) म्हणजे वार्षिक रु.२,४३,०९,६००/- (रुपये दोन कोटी त्र्येचाळीस लाख नऊ हजार सहाशे फक्त) इतक्या खर्चास भाडेकरारनामा अंमलात येईल त्या दिनांकापासून या आदेशाद्वारे प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

२. वरीलप्रमाणे प्रस्तावाअंतर्गत जागा भाडे तत्त्वावर घेण्यासाठी महानगर टेलिफोन निगम लिमिटेड, मुंबई यांच्याशी भाडे करारनामा करण्याची कार्यवाही सरकारी वकील, अपिल शाखा (रिट सेल), उच्च न्यायालय, मुंबई यांनी तात्काळ करावी.

३. याप्रित्यर्थचा खर्च हा "मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान (दत्तमत), ११४ (००) (०१), विधी सल्लागार व समुपदेशी (शहर अधिकारी), १३ कार्यालयीन खर्च " (संकेतांक क्रमांक २०१४ ०२९९) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या-त्या वर्षाच्या मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला,उपविभाग एक, अनु.क्र.१०, नियम क्र.११५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांन्वये तथा वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.८५९/१७/व्यय-५, दि.३१.८.२०१७ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०९०११६३८०३८७१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Akusing Narshi Vasave

Digitally signed by Akusing Narshi Vasave
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5ab84183e07eb916b3161523e73f56110b7dfcea4b15e66c8dac75aa76eaad47, cn=Akusing Narshi Vasave
Date: 2017.09.01 16:28:02 +05'30'

(आ. न. वसावे)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव.
२) मा.राज्यमंत्री (विधि व न्याय विभाग) यांचे खाजगी सचिव.
३) सर्व विधानमंडळ सदस्य.
४) मा.मुख्य सचिवांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५) अतिरिक्त मुख्य सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) प्रधान सचिव व विधि मरामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) सरकारी वकील, अपिल शाखा (रिट सेल), उच्च न्यायालय, मुंबई.
९) उप महाप्रबंधक (कुपरेज), ६ वा मजला, कुपरेज टेलिफोन एक्स्चेंज इमारत, एम.के.मार्ग, मुंबई-२१.
१०) महालेखापाल, (लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१,मुंबई.

११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१३) वित्त विभाग/व्यय-५, मंत्रालय, मुंबई.
१४) निवडनस्ती/का.८